"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# एक अल्लाहवर श्रद्धा

जर तुम्हाला कुणी असे सांगितले की ही रेल्वे, जी हजारो प्रवाशांची ने-आण करते, आपोआपच तयार झाली आणि आपोआपच चालते, वाटेल तेव्हा आपल्या मर्जीने थांबते आणि वाटेल तेव्हा आपल्या मर्जीने पुढच्या स्थानकाकडे रवाना होते, तर तुम्हाला विश्वास तरी होईल काय? तुम्ही म्हणाल की.... मी रेल्वे तयार करणाऱ्यास पाहिले नसले तरी मी तुमच्या बोलण्यावर मुळीच विश्वास ठेवणार नाही की रेल्वे कुणीही न बनविता आपोआपच तयार झाली आणि कुणीही न चालविता आपोआपच चालते.

रेल्वे तर खूप मोठी बाब आहे. तुम्ही तर हेदेखील मान्य करणार नाही की एखादे घर, एखादी खुर्ची, एखादे पेन अगर अशीच एखादी वस्तू कुणीही तयार न करता आपोआपच तयार झाली असावी. आता याच अनुषंगाने या जगाकडे पाहावे. ही पृथ्वी जिच्यावर आपण वास्तव्य करतो, हा चंद्र आणि हा तळपणारा सूर्य, ज्यांमुळे आपल्याला प्रकाश मिळतो, हे कोट्यवधींच्या संख्येत जगमगणारे तारे, हा प्रचंड समुद्र, हा वारा, हे विविध तऱ्हेचे प्राणी, चिवचिवणाऱ्या चिमण्या आणि हे खळखळणारे झरे याबरोबरच आपण सर्व मानव.... हे सर्वकाही आपोआपच तयार झाले आहेत काय? आणि कुणी सांगितलेच की होय! हे सर्व आपोआपच तयार झाले, तर तुमचा विश्वास तरी बसेल काय?

सूर्य हा पृथ्वीपेक्षा लाखो पटीने मोठा असून त्या विश्वात आणखीनही बरेच सूर्य आहेत आणि ते आपल्या या सूर्यापेक्षाही कितीतरी पटीने मोठे आहेत. शिवाय आकाशगंगेत असंख्य तारे आपापल्या भ्रमणकक्षेत व्यवस्थितरित्या फिरत आहेत. प्रत्येक ग्रह आणि प्रत्येक तारा अगदी नियोजित कक्षेत आणि नियोजित गतीने नियोजित वेळेनुसार भ्रमण करीत असून त्यात तिळमात्र फरक पडत नाही. सूर्याच्या तापमानामुळे समुद्राच्या पाण्याचे बाष्पीभवन होते, हे बाष्प वारा पुढे घेऊन जातो आणि मग परत नियोजित वेळेवरच हेच बाष्प पर्जन्याच्या स्वरूपात बरसते. जणू हे त्यांचे निश्चित ठरवून दिलेले कार्यच! जणू आपापल्या कर्तव्याशी कुणीही तिळमात्र कुचराई करीत नाही.

पाऊस आपल्या जीवनाचा मुख्य सहारा आहे. पाऊस पडतो आणि सर्वत्र वनराई हिरवी होते. तऱ्हे-तऱ्हेची पिके, फुले, फळे, आपल्याला आणि प्राण्यांना प्राप्त होतात. पाऊसच जर पडला नाही तर काय-काय घडू शकते, याची कल्पना न केलेलीच बरी. असे स्पष्टपणे दिसते की ही प्रचंड सृष्टी आणि यातील प्रत्येक घटना अगदी नियोजनबद्धरित्या घडते. जणू हे प्रचंड विश्व एक प्रचंड मोठा कारखानाच आहे.

आता विचार करण्याची गोष्ट अशी आहे की हे कारखानारूपी प्रचंड मोठे विश्व आणि यातील या नियोजनबद्ध घटना-कार्य आपोआपच सुरू आहे काय? हे सर्वकाही चालविणारा

आणि सांभाळणारा वा निगराणी करणारा कोणी आहे की नाही? तर वस्तुस्थिती अशी आहे की या विश्वाची निर्मिती करणारा निर्माता असून त्याच्याच आदेशाने हे संपूर्ण विश्व कार्यरत आहे. येथे जे काही होत आहे, ते त्याच निर्मात्या आणि संचालकाच्या मर्जीने होत आहे. येथे एक कणसुद्धा स्वत:हून अस्तित्वात आलेला नसून कोणतीही घटना व कार्य आपोआप घडत नाही.

आता आपण स्वत:लाच पाहावे. आपल्याला किती सुंदर आणि सुरेख शरीर मिळालेले आहे. या शरीरात कशा विविध शक्ती व सामर्थ्य आहे. आपण जेव्हा बोलतो तेव्हा आपण केवळ आपली जीभ, कंठ आणि ओठांना कार्यरत करतो आणि मग वाटेल तसा आवाज शब्दाच्या स्वरूपात बाहेर पडतो. या शब्दांना काही अर्थ असतो. जी भावना अगर विचार आपल्या मनात असते, ती शब्दांच्या माध्यमाने इतरांपर्यंत पोचवितो. हे कार्य प्रत्येकजण करू शकतो आणि हे करण्यासाठी कोणतेही कष्ट करावे लागत नाही. म्हणूनच आपले याकडे कधी लक्षदेखील जात नाही की हे बोलणे किती मोठी बाब आहे. आपण असे लोकसुद्धा पाहिलेत, ज्यांना बोलता येत नाही. ते जन्मजात मुके असतात. आजपर्यंत अशा कोणत्याही प्रकारच्या यंत्राचा शोध लागला नाही, ज्यामुळे जन्मजात मुक्या व्यक्तीस बोलता येणे शक्य व्हावे.

आपण आपल्या कर्णेंद्रियांनी ऐकतो, याचा अर्थ असा की इतरांच्या आवाजाचा ध्वनी कानांवर आदळतो आणि आपणास समजते की कोण काय बोलत आहे अथवा कोणते पशु-पक्षी कसला आवाज काढत आहेत, अथवा ढोल-ताशा कशा प्रकारे वाजत आहे. आपण हेसुद्धा जाणतो की जे लोक जन्मजात बहिरे असतात अथवा काहीजण नंतरच्या काळात बहिरे होतात, मात्र हरविलेली अथवा जन्मजात नसलेली दृकशक्ती निर्माण करण्याचे सामर्थ्य प्रदान करू शकत नाही. याच प्रकारे इतर ज्ञानेंद्रियांची अवस्था आहे. अर्थात पाहणे, वास घेणे, विचार करणे, स्पर्श करणे वगैरे हे सर्वकाही अत्यंत आश्चर्यकारक कर्म आहेत की यासाठीची इंद्रियशक्ती एकदा हरविली की जगात कोणातही ही शक्ती देण्याचे सामर्थ्य नाही.

आता विचार करण्याची गोष्ट अशी आहे की असा हा बोलणारा, पाहणारा, ऐकणारा गंध घेणारा, विचार करणारा आणि अशा ना-ना प्रकारचे सामर्थ्य असणारा हा विलक्षण आणि विचित्र माणूस, जो असे कार्य करतो, असे प्रताप दाखवितो की माणसाची अक्कल दंग होते. अर्थातच माणसाच्या शरीराचा एकेक अवयव हेच स्पष्ट करतो की हे संपूर्ण मानवी शरीर, हे विलक्षण सामर्थ्यशाली शरीर आपोआपच तयार झालेले नसून ते अत्यंत कौशल्यवान आणि प्रचंड कला-सामर्थ्य असलेल्या, हाडाचा कारागीर असलेल्या अत्यंत बुद्धिमान निर्मात्याने निर्माण केलेले असून त्याच्यासम इतर कोणताही कारागीर असूच शकत नाही. आपल्याला हेदेखील चांगलेच माहीत आहे की माणूस मातेच्या पोटात अथवा

गर्भाशयात तयार होतो. मात्र खरे सांगायचे झाले तर मातेच्या गर्भाशयाच्या अथवा माणूस तयार करणाऱ्या या कारखान्याच्या कार्यात मातेचा वाटा नसतो. अखत्यार नसतो. आपण असे म्हणू शकत नाही की आईच मुलाची निर्माती असते. याचप्रमाणे मुलाचा पितादेखील या निर्मितीकार्यात सहभागी नसतो. अर्थात मुलाचे निर्माते माता-पिता नसतातच मुळी. एका लहानशा गर्भाशयात प्रवेश करणारा अत्यंत सूक्ष्म जीव (Sperm) याला मातेच्या रक्तातून पोषक घटक प्राप्त होतात. मग खरे पाहता हे पोषक घटक पुरविणारे रक्त माता स्वत: तयार करते काय? तिला तर हेदेखील माहीत नसते की बाळाला किती प्रमाणात रक्त मिळत आहे आणि त्याची वाढ कशी होत आहे. स्त्री जे काही खाते-पिते, त्यातूनच निर्माण होणारे रक्त हळूहळू मानवी शरीराचे स्वरूप धारण करते. मग असे कोण आणि कशाच्या आधारावर म्हणू शकतो की स्वत: आई हे कार्य करीत आहे?

थोड्याशा काळात या रक्ताचा गोळा शरीराचे स्वरूप धारण करू लागतो. डोळ्यांच्या ठिकाणी डोळे, कानाच्या ठिकाणी कान, हृदयाच्या ठिकाणी हृदय, मेंदूच्या ठिकाणी मेंदू, कानाच्या ठिकाणी कान, यकृताच्या ठिकाणी यकृत, जठराच्या ठिकाणी जठर, फुप्फुसाच्या ठिकाणी फुप्फुस, धमण्याच्या ठिकाणी धमण्या आणि मानवी शरीरास आवश्यक असणारे समस्त अवयव अगदी व्यवस्थित व नीटनेटके आपापल्या ठिकाणी तयार होतात. मग या परिपूर्ण शरीरात प्राण येतो आणि मानवात मानवी सामर्थ्य येते. मग मातेचे गर्भाशय अर्थात मानव तयार करणारा हा विलक्षण कारखाना नऊ महिन्यांनंतर बरोबर वेळेवर या अर्भकास बाहेर फेकून देतो. बाहेर येताच त्याचे सर्व अवयव कार्यरत होतात. पूर्वीच तयार झालेले आईच्या छातीतील दूध जे स्वत: आई तयार करीत नसते, बाळ गुटू-गुटू प्यायला लागते, श्वास घ्यायला लागते. अशाप्रकारे कोट्यवधी लोक या जगात तयार होत असतात आणि प्रत्येकाचा चेहरा-मोहरा व स्वरूप वेगळे व परस्पर भिन्न असते. प्रत्येकाची प्रवृत्ती भिन्न असते, प्रत्येकाचा स्वभाव भिन्न असतो, प्रत्येकाचा विचार, आवड-निवड, शक्ती, सामर्थ्य कौशल्य, पात्रता आणि भावना भिन्न असतात. या विषयावर जेवढा विचार करण्यात येईल, तेवढेच आश्चर्याचे डोंगर वाढत जाईल आणि आपल्या अंत:करणातून साद निघेल की अशा प्रकारचे विलक्षण कार्य एक प्रचंड कौशल्य-सामर्थ्य असणारा निर्माताच करू शकतो. हा निर्माता तोच अल्लाह ज्याने समस्त जगाची निर्मिती केली असून यात इतर कोणीही त्याचा भागीदार व वाटेकरू असू शकत नाही.

आणखीन एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे आणि ती अशी की या जगात लहान वा मोठे कोणतेही कार्य खऱ्या अर्थाने मार्गी लागत नाही. याच्या पूर्ततेकरिता एकावरच याची जबाबदारी असते. कोणत्याही राज्याला दोन राज्यपाल, दोन मुख्यमंत्री, कोणत्याही देशाचे दोन पंतप्रधान, दोन राष्ट्राध्यक्ष कधीच असू शकत नाहीत आणि अशी कल्पनासुद्धा करणे शक्य नाही. कारण असे असेल तर कोणतेही राज्य, कोणतेही राष्ट्र आणि कोणताही

देश चालू शकत नाही. कारण कर्ताधर्ता आणि जबाबदार केवळ एकच असू शकतो. आता जर आपण आपल्या सभोवतालच्या या अतिविशाल आणि विलक्षण सृष्टीवर नजर टाकली आणि यावर जर विचार केला की ही सृष्टी कशी निर्माण झाली व कशी कार्यरत आहे, आकाशातून होणारी वर्षा, यामुळे फुलणारी, हिरवीगार होणारी वनराई, सूर्यापासून मिळणाऱ्या उष्णतेपासून पाण्याचे होणारे बाष्पीभवन, हे बाष्प वाहून नेणारे वारे, रात्रंदिवस उजाडणारी ही पृथ्वी आणि ग्रह-ताऱ्यांची भ्रमणावस्था, हे सर्वकाही घडत आहे. वैज्ञानिकांनी हेसुद्धा सांगितले आहे की वनस्पतीच्या जीवनासाठी आवश्यक असलेली पोषक माती तयार करण्यासाठी सूक्ष्म कृमी-कीटक कार्य करीत आहेत. ते हवेतून नायट्रोजन प्राप्त करून वनस्पतींना पुरवितात. अर्थातच जमिनीत पेरण्यात आलेले बी मोठे झुडुप आणि वृक्ष होण्यासाठी या विश्वातील समस्त ग्रह-तारे, सूर्य, चंद्र, समूह, पवन, कृमी-कीटक आणि अशा असंख्य वस्तूंना कार्य करावे लागते आणि तेदेखील अगदी वेळेवर, विनातक्रार, व्यवस्थित व नीटनेटके. जणू हे संपूर्ण कार्य एकाच शक्तिशाली सत्तेच्या इशाऱ्यावर चालू आहे.

जरा या विस्तीर्ण आकाशाकडे पाहा, निरखून पाहा. सूर्य हा अगदी निश्चित पद्धतीनुसार कार्य करीत आहे. दिवस आणि रात्र अगदी वेळेवर होत आहे. उन्हाळा, पावसाळा आणि हिवाळा वेळेवर होत आहे. चंद्राचे कार्य नेमक्या पद्धतीनुसारच सुरू आहे. त्याच्या भ्रमण गतीमध्ये कसलाही फरक पडत नाही. एवढेच नव्हे तर आकाशातील समस्त ग्रह आणि तारे जे कोट्यवधींच्या संख्येत आहेत, अगदी व्यवस्थितपणे आपापले कार्य करीत आहेत. आपापल्या भ्रमणकक्षा सोडून इतरांच्या भ्रमणकक्षेला किंचित स्पर्शसुद्धा करीत नाहीत. नसता एक-दुसऱ्यांची टक्कर होऊन छिन्नविछिन्न झाले असते. असे वाटते जणू हे सर्व ग्रह-तारे एखाद्या यंत्राच्या भागांप्रमाणे आपापले कार्य व्यवस्थितपणे करीत आहेत.

विचार करण्यासारखी बाब आहे की शेवटी हे काय प्रकरण आहे की जमिनीतून वनस्पती उगविण्यासाठी अथवा पिके उगविण्यासाठी व ती वाढविण्यासाठी ज्या ज्या गोष्टींची गरज आहे, त्या गोष्टी व्यवस्थितरित्या घडत आहेत, समस्त वस्तू परस्पर सहकार्याने कार्य करीत आहेत. यापैकी एकही वस्तू आपले कार्य किंचितही सोडायला तयार नाही वा मुळीच हलगर्जी करीत नाही. शेवटी हे काय प्रकरण आणि कोणते गूढ आहे की या प्रचंड आणि विलक्षण विश्वरूपी कारखान्याचे समस्त कार्य वस्तूंच्या परस्पर सहकार्यातून सुरळीपतणे चालू आहे. या प्रश्नाचे केवळ एकच उत्तर असू शकते आणि ते असे की हे पूर्ण कार्य कोण्या एकाच सम्राट आणि प्रभुच्या इशाऱ्यावर होत आहे. केवळ एकाच व्यवस्थापक अर्थात अल्लाहच्या आदेशाने हे विश्व कार्यरत आहे. जर या विश्वाचे संचालक एकापेक्षा जास्त असते तर या कार्यात परस्पर सहयोग आणि सहकार्य शक्यच झाले नसते.

# अल्लाहच्या पैगंबरांवर श्रद्धा

पूर्ण विश्व स्वयं अल्लाहने निर्माण केले, त्यानेच याची रचना केली. तोच एकटा या समस्त विश्वाचा स्वामी आहे. त्याच्याच मर्जी व आदेशाने समस्त कार्य सुरळीत आणि व्यवस्थितपणे सुरू आहे. सृष्टीतील प्रत्येक वस्तू ज्या कार्यासाठी तयार करण्यात आली ते कार्य ती करीत आहे. प्रत्येक वस्तूचे नियम ठरवून देण्यात आलेले आहेत. त्या ठराविक नियमांचे पालन प्रत्येक वस्तू विनातक्रार करीत आहे. पाणी वाहण्याचे, त्याचे बाष्पीभवन होण्याचे, बर्फ बनण्याचे विशेष नियम ठरवून देण्यात आले आहेत ते या नियमांचे उल्लंघन करू शकत नाही. सूर्य, चंद्र आणि ताऱ्यांचे, ग्रह आणि नक्षत्रांचे नियम ठरवून देण्यात आले आहेत. या नियमांचे किंचितही उल्लंघन कोणी करू शकत नाही. या नियमांबाहेर तसूभरही सरकण्याचे कोणातही सामर्थ्य नाही. आकाशातून पर्जन्यवृष्टी होते, जमिनीतून फळे, फुले आणि धान्य मिळते. मात्र ही समस्त वनस्पती-सृष्टी स्वत:च्या मर्जीने काहीही करू शकत नाही. अर्थातच या विश्वातली प्रत्येक निर्मिती ज्या कामासाठी तयार करण्यात आलेली आहे ती तेच नेमून दिलेले काम नेमून दिलेल्या नियमानुसार सुरळीत आणि व्यवस्थितपणे पार पाडीत आहे. विश्वातील सर्वच वस्तू ज्याप्रमाणे अल्लाहची निर्मिती आहेत, त्याचप्रमाणे मानवदेखील अल्लाहची निर्मिती आहे, उत्कृष्ट रचना आहे. मानवाची निर्मिती, त्याचे जीवित राहणे, मरणे वगैरे सर्वकाही निश्चित करून देण्यात आले आहे. याच नेमून दिलेल्या कायद्यानुसार जन्मापासून अर्थात मातेच्या गर्भातील निर्मितीपासून ते मृत्यूपर्यंत प्रत्येक कार्य मानवाकडून होत असते. मानवसुद्धा या नियमांचे तसूभरही उल्लंघन करू शकत नाही. जन्माचे जे नियम आहेत, त्याच नियमानुसार तो जन्म घेऊ शकतो. डोळ्यांनी ऐकण्याचे, कानांनी बोलण्याचे, पायांनी खाण्याचे, तोंडाने चालण्याचे काम करू शकत नाही. तो निश्चितच आपले पूर्ण कार्य अल्लाहने नेमून दिलेल्या निसर्ग-नियमांनुसार करू शकतो. या नियमांच्या किंचितही बाहेर जाऊ शकत नाही.

मानवाचा आणखीन एक पैलू आहे आणि तो असा की मानवाचा दर्जा आणखीन इतर वस्तूंपेक्षा विशेष आहे. मानव हा या सृष्टीची विशेष निर्मिती आहे. अल्लाहने इतर निर्मितींना प्रदान न केलेले विवेकसामर्थ्य आणि बुद्धी केवळ मानवालाच प्रदान केली आणि याबरोबरच त्याला कार्यस्वातंत्र्य प्रदान केले, विचारस्वातंत्र्य प्रदान केले, भूमिकास्वातंत्र्य प्रदान केले. चांगला आणि वाईट या दोन्ही मार्गांपैकी एकाची निवड करण्याचे स्वातंत्र्य दिले. ईशप्रदत्त शक्ती व सामर्थ्याचा चांगल्या आणि वाईट या दोन्ही पद्धतीने वापर करू शकतो. अशाप्रकारे अल्लाहने मानवास एका पैलूने कार्यस्वातंत्र्य दिले.

अल्लाहने मानवास जे कार्यस्वातंत्र्य दिले आहे, त्याचा वापर कसा करावा हा एक सर्वांत मूळ प्रश्न आहे. कारण याच स्वातंत्र्याचा वापर करण्यावर त्याच्या जीवनाचे यश

आणि अपयश अवलंबून आहे. याच आधारावर जगाच्या व्यवस्थेचा सुधार आणि बिघाड अवलंबून आहे. तुम्ही कदाचित असेही म्हणू शकता की मानवास जे विवेकसामर्थ्य अल्लाहने प्रदान केलेले आहे, त्याचा वापर करून तो आपल्या कार्यस्वातंत्र्याचा योग्य प्रकारे वापर करू शकतो. मात्र तुम्हाला हेदेखील स्वीकारावे लागेल की मानवाचे विवेकसामर्थ्यसुद्धा मर्यादित स्वरूपाचे आहे. शिवाय प्रत्येक व्यक्तीची विवेकशक्ती भिन्न असून तो आज घेतलेला निर्णय तीच व्यक्ती उद्या आपल्या अनुभवाच्या आधारावर आपला निर्णय बदलते. घेतलेला निर्णय आजच्या अनुभवाच्या आधारावर चुकीचा ठरविते. एकजण जो निर्णय योग्य ठरवितो, तोच निर्णय दुसराजण चुकीचा ठरवितो. भूतकाळातील घेण्यात आलेले निर्णय ज्याप्रमाणे आज आपण चुकीचे ठरवितो त्याचप्रमाणे आज आपण घेतलेला आणि योग्य वाटणारा निर्णय उद्या येणारी पिढी चुकीचा व अयोग्य ठरवू शकते. यावरून हेच सिद्ध होते की मानव हा केवळ आपल्या स्वत:च्या विवेकसामर्थ्याच्या आधारावर आपला जीवनमार्ग निश्चित करू शकत नाही. त्याला निश्चितच बिनचूक आणि कोणत्याही त्रुटीपासून मुक्त असलेल्या मार्गदर्शनाची नितांत गरज आहे. म्हणूनच अशा प्रकारचे परिपूर्ण आणि बिनचूक मार्गदर्शन, जे माणसाच्या भूत, वर्तमान आणि भविष्यातही योग्य असावे, प्रत्येक वृत्तीच्या आणि भिन्न स्वभावाच्या व्यक्तीसाठी योग्य ठरावे.

आपण पाहतो की मानवास हे जीवन जगण्यासाठी असंख्य बाबींची आवश्यकता असते. श्वास घेण्यासाठी हवा, पिण्यासाठी पाणी, खाण्यासाठी अन्न, पोषाख, निवारा आणि इतर बऱ्याच गोष्टींची गरज असते. त्याचप्रमाणे मानव हा या सृष्टीत जन्मला असून त्यास जगण्यासाठी आवश्यक असलेल्या समस्त गरजांची मोठ्या कौशल्याने निर्मिती करून देण्यात आलेली आहे. हवा, अन्न, पाणी, निवारा, स्वारी, कपडालत्ता आणि यासारख्या ना-ना वस्तू पुरविण्यासाठी पूर्णपणे प्रबंध अल्लाहने करून ठेवले आहेत. याचाच अर्थ असा की अल्लाहने मानवाची निर्मिती केली, जीवन प्रदान केले आणि त्यास जगण्यासाठी आवश्यक असलेल्या समस्त वस्तुंची योग्य प्रकारे व्यवस्था केली. म्हणजेच मानवास जीवन व्यतीत करण्यासाठी मार्गदर्शनाचीसुद्धा गरज आहे. आपले स्वातंत्र्य, आपली शक्ती आणि सामर्थ्याचा वापर कसा करावा याचे मार्गदर्शन त्यास नितांत आवश्यक आहे. कारण मार्गदर्शनाशिवाय मानव आपल्या स्वातंत्र्य, शक्ती आणि सामर्थ्याचा गैरवापर करू शकतो आणि अशा प्रकारे त्याचे जीवन विध्वंसाच्या मार्गावर जाऊ शकते. अर्थातच जीवन जगण्यासाठी भौतिक पदार्थ, अन्न, पाणी, निवारा वगैरेची ज्याप्रमाणे गरज आहे अगदी त्याचप्रमाणे योग्य मार्गदर्शनाचीसुद्धा मानवास नितांत गरज आहे. परमदयाळू आणि कृपाळू अल्लाहने मानवास जगण्याकरिता अन्न, पाणी, हवा आणि इतर वस्तूंची ज्याप्रमाणे पूर्णत: व्यवस्था केली, अगदी त्याचप्रमाणे त्याच्या मार्गदर्शनासाठीदेखील पूर्ण व्यवस्था केली आहे आणि यात नवल वाटण्यासारखेसुद्धा काहीही नाही. कारण हे तर मुळीच शक्य नाही की

जो अल्लाह भावनांच्या भौतिक गरजा पूर्ण करण्यासाठी या विश्वात मातीच्या प्रचंड विशाल ग्रह-तारे, समुद्र, हवा, चंद्र व सूर्याला कामाला लावून अन्न, पाणी, निवारा आणि यासारख्या ना-ना अद्‌भूत वस्तूंची निर्मिती केली, तो दयाळू आणि कृपाळू अल्लाह मानवाच्या मार्गदर्शनाची गरज पूर्ण करणार नाही.

मानव इतिहास आपल्या समोर आहे. देश आणि राष्ट्रांत मानवास जीवन जगण्यासाठी काही असे कायदे आहेत ज्याविषयी असा दावा करण्यात येतो की हे अल्लाहचे कायदे आहेत. प्रत्येक राष्ट्रात असे बरेचजण होऊन गेले ज्यांचा असा दावा होता की त्यांच्याकडे मानवाच्या योग्य मार्गदर्शनासाठी ईशसंदेश आहे. या महामानवांनी प्रत्येक काळात हे दाखविले की अल्लाहची मर्जी काय आहे आणि त्याने मानवास जे स्वातंत्र्य आणि अधिकार दिले आहेत, त्यांचा वापर कशा पद्धतीने व्हावा. या महामानवांनी प्रत्येक काळात सांगितले आहे की चांगले काय आहे नि वाईट काय आहे, सत्य काय आहे नि असत्य काय आहे, पुण्य काय आहे नि पाप काय आहे. ही वेगळी गोष्ट आहे की या बाबतीत बऱ्याच लोकांकडून मूळ सत्य अस्पष्ट होत गेले. उदा.- (१) काही लोकांनी या महामानवाच्या मूळ शिकवणीत इतर काहीजणांच्या शिकवणी समाविष्ट केल्या आणि ऐतिहासिकदृष्ट्या आज मूळ शिकवणींना भेसळमुक्त करणे अशक्य होऊन बसले. (२) बऱ्याच लोकांनी या महामानवांच्या मूळ चारित्र्यास कथा-दंतकथा आणि साहित्याचा मुलामा दिला. यामुळे आज हे जाणून घेणे अशक्य झाले की कोणत्या महामानवाची शिकवण कोणती आहे. (३) काहीजणांनी या महामानवांना मानव म्हणून न स्वीकारता अल्लाहच्याच स्थानावर स्थानापन्न करण्याचा प्रयत्न केला. बऱ्याचजणांना भ्रम झाला की साक्षात ईश्वरच मानवाचा अवतार घेऊन पृथ्वीवर अवतरला आणि या जगातून असत्य व अन्यायाचा नाश केला. मात्र वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाहचे मानवरूपात प्रकट होणे हे कोणत्याही प्रकारे शोभणीय नसून तो आपल्या काही नेक भक्तांना मानवाचे मार्गदर्शन करण्यासाठी निवडतो.

ज्या नेक भक्तींची अल्लाहने मानवजातीस सत्यमार्ग दाखविण्याकरिता निवड केली, त्यांनाच मुळात पैगंबर असे म्हणतात. अल्लाह त्यांना प्रत्येक दुराचारापासून मुक्त ठेवतो. त्यांना आपला संदेश देतो जेणेकरून अल्लाहचा हा संदेश त्यांनी मानवजातीपर्यंत पोचवावा. जी व्यक्ती अल्लाहवर तर श्रद्धा ठेवते आणि मान्य करीत नसेल की अल्लाहकडून काहीजण धर्ममार्ग, सत्यमार्ग अथवा न्यायाचा मार्ग दाखविण्यासाठी पैगंबर पाठविण्यात आले, तर तो त्याला मान्य असलेल्या धार्मिक शिकवणी वा ईशमार्गदर्शन हे अल्लाहकडूनच प्राप्त असण्याचा दावा कशाच्या आधारे करू शकतो? पैगंबर हे तर अल्लाह आणि त्याचे दास अर्थात मानवजात या दोहोंदरम्यान एक दुवा आहे. अर्थात असा प्रामाणिक पुण्यकर्मी माणूस जो अल्लाहचा संदेश मानवजातीपर्यंत पोचवितो यालाच पैगंबर अथवा पैगंबर असे म्हणतात.

# अंतिम निवाड्याच्या दिवसावर श्रद्धा

इथपर्यंत आपण पाहिले की या सृष्टीचा निर्माता, पोशिंदा, स्वामी व प्रभू परम दयाळू व कृपाळू अल्लाह असून तो मानवजातीच्या कल्याणकारी मार्गदर्शनासाठी पैगंबर पाठवितो, जे या जगाच्या पाठीवर वसणाऱ्या समस्त मानवांना योग्य मार्गदर्शन करतात, सत्य-असत्य, खरे-खोटे, योग्य-अयोग्य, न्याय-अन्याय आणि चांगल्या-वाईटाचा फरक सांगतात. सत्याची, न्यायाची आणि सदाचाराची स्थापना करतात. माणसास माणूस बनवितात.

मात्र आपण याबरोबरच हेसुद्धा पाहिले आहे की मानव हा एक स्वतंत्र आणि स्वावलंबी जीव आहे. तो इतर सजीवांप्रमाणे विवश, निष्प्रभ आणि हतबलसुद्धा नाही. चांगल्या आणि वाईट, सत्य आणि असत्य मार्गांपैकी कोणत्याही एका मार्गाची निवड करण्याचे स्वातंत्र्य आणि सामर्थ्य त्याच्यात आहे. सत्याचा मार्ग हा पैगंबरांनी दाखविलेला मार्ग असून पैगंबरांच्या मार्गाविरूद्ध असलेला मार्ग म्हणजे असत्य, अन्याय व दुराचाराचा मार्ग होय. या जगाच्या इतिहासात लोकांनी याच दोन मार्गांपैकी एका मार्गाची निवड केली आहे. आजही याच इतिहासाची पुनरावृत्ती होत आहे. आज आपण पाहतो की या जगामध्ये चांगले आणि वाईट या दोन्ही प्रकारचे लोक आहेत. ईशमार्गावर चालणारेही आहेत आणि ईशद्रोहीसुद्धा आहेत.

या परिस्थितीवर गंभीरपणे जर आपण विचार केला तर हा प्रश्न उभा राहतो की सरळमार्गी आणि दुष्कर्मी वा अन्यायी लोकांत साम्य आहे काय? दोघांचा परिणाम सारखाच होईल काय? मुळीच नाही. शक्यही नाही. कारण अल्लाहकडून मार्गदर्शन अथवा जीवनाचा योग्य आणि सत्यमार्ग मिळाल्यास तसेच हा सत्यमार्ग स्वीकारण्याचे व न स्वीकारण्याचे स्वातंत्र्य असूनही न स्वीकारणाऱ्यांना कोणत्याही प्रकारचा जाब विचारण्यात येणार नाही आणि स्वीकारणाऱ्यांना त्यांच्या आज्ञाधारकतेचा कोणताही बदला मिळणार नाही, हे तर बुद्धीला मुळीच पटणारे नाही.

अल्लाहच्या पैगंबरांनी अल्लाहचा संदेश मानवजातीला प्रदान केला व या संदेशाबरोबरच या वस्तुस्थितीबाबतही खबरदार केले आहे की वर्तमान जीवनाची ही मुदत मुळात एका परीक्षेपुरता कार्यकाळ आहे. अल्लाहने मानवास चांगले वा वाईट निवडण्याचे जे स्वातंत्र्य प्रदान केले, ते यासाठीच केले की मानवाची परीक्षा घ्यावी की कोणती व्यक्ती आपल्या स्वातंत्र्याचा खऱ्या अर्थाने आणि चांगल्या प्रकारे वापर करते, सदुपयोग करते आणि कोणती व्यक्ती याचा दुरुपयोग करते. अल्लाहने मानवजातीस मार्गदर्शन देण्याचा एक पैलू हादेखील आहे की लोकांनी हे मार्गदर्शन स्वीकारावे आणि याचा योग्य व पुरेपूर मोबदला प्राप्त करावा. त्याचप्रमाणे ज्यांनी हे मार्गदर्शन डावलले आणि आपल्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग करून

मनमानी केली, त्यांना याची शिक्षाही भोगावी लागणार. म्हणूनच अल्लाहच्या पैगंबरांनी मानवजातीस स्पष्ट शब्दांत खबरदार केले की हे वर्तमान जीवन कर्म करण्याचे कार्यक्षेत्र आहे. या जीवनात जी व्यक्ती अल्लाहने दाखविलेल्या मार्गदर्शनानुसार जीवनाची वाटचाल करील, अल्लाहने दाखविलेल्या सत्यमार्गावर जीवन व्यतीत करील, नेकी आणि सदाचाराचे जीवन व्यतीत करील, त्यास याचा उत्तम मोबदला मिळेल. त्याचप्रमाणे जी व्यक्ती या मार्गाविरूद्ध जीवन व्यतीत करील, त्या व्यक्तीस कठोर शिक्षा मिळेल. त्यांनी याविषयीदेखील मानवजातीस खबरदार केले की आम्ही (पैगंबर) अल्लाहने प्रदान केलेल्या ज्ञानाच्या आधारावर समस्त मानवांना हे दाखवू इच्छितो की हा विश्वरूपी कारखाना एके दिवशी नष्ट करण्यात येईल. समस्त मानवजातीस परत जीवित करण्यात येईल आणि प्रत्येकास प्रभु, अल्लाहसमोर आपापल्या कर्मांचा जाब द्यावा लागणार आहे. या गोष्टीचा जाब की अल्लाहने प्रदान केलेल्या शक्ती व सामर्थ्याचा, स्वातंत्र्य व क्षमतेचा, कौशल्य व पात्रतेचा वापर कोणत्या व कशा पद्धतीने केला. अल्लाहच्या मर्जीनुसार केला की त्याच्या अवज्ञेनुसार केला. याबरोबरच अल्लाहने आपल्या पैगंबरांच्या माध्यमाने हेदेखील स्पष्ट केले की अल्लाहच्या मर्जीनुसार जीवन व्यतीत करण्याचे प्रचंड बक्षीस मिळेल, अर्थात अविनाशी असलेली स्वर्गप्राप्ती होईल. याउलट अल्लाहची अवज्ञा करून इतर कुणाच्या आज्ञेनुसार वा मर्जीनुसार जीवन जगण्याचे फलित अत्यंत वाईट मिळेल, अर्थात कधीही न संपणाऱ्या नरकयातना मिळतील. यातून कधीही सुटका होणार नाही.

मृत्यूनंतर परत जीवन मिळणार की नाही, मृत्यूनंतरचे जीवन कसे असेल, याविषयीची माहिती मिळविण्याची साधने आपल्याकडे नाहीत. काहींचे मत आहे की आपले हेच वर्तमान जीवन एवढेच आहे. मृत्यूनंतर कोणतेही जीवन नाही. मृत्यूनंतर जीवनाची कल्पना करणे हे केवळ एक कपोलकल्पित बाब आहे. वास्तविकतेशी याचा कुठलाही संबंध नाही. मात्र जर असे असते तर प्रश्नच मिटला असता. यावर विचार करण्याची गरजसुद्धा पडली नसती. कसले पुण्य आणि कसले पाप? पद्धतशीरपणे मस्तपैकी जीवन भोगायचे नि मरून जायचे, संपले! मात्र ही वस्तुस्थिती विसरण्यासारखी मुळीच नाही की आपल्या वर्तमान जीवनाशी या कल्पनाविलास वाटणाऱ्या बाबीचा दृढ संबंध आहे. विशेषत: आपल्या नैतिक जीवनाचा तर याशीच संबंध आहे. उदाहरणार्थ, आपण थोड्या वेळेसाठी असे समजू या की मृत्यूनंतर कोणत्याही प्रकारचे जीवन नाही आणि आपल्या जीवनाचा वा भल्या-बुऱ्या कर्मांचा जाब द्यावा लागणार नाही, ज्या जीवनाच्या यशापयशाची मदार वर्तमान जीवनावर आहे. तर याचा परिणाम निश्चितच आपल्या वर्तमान जीवनावर असा होईल की आपल्या जीवनातून पाप-पुण्याचा कोणताही मोबदला जर मिळत नसेल आणि पापाची कोणतीही शिक्षा भोगावी लागणार नसेल तर मग चांगले आणि सदाचाराचे विनाकारण लचांड गळ्यात घालून घ्यायचेच कशाला? मग वाटेल तसे जगायचे. नैतिकता,

मानवता आणि सदाचाराची बिनधास्त होळी करायची. आपले जीवन रंगवून घेण्यासाठी इतरांच्या रक्ताने बिनधास्त शिमगा खेळायचा, वाटेल त्याला खपवायचे, वाटेल ते हिसकावून घ्यायचे, साऱ्यावर आपलीच मनमानी स्थापन करायची. कारण जीवन हे एकदाच मिळालेले असते, ते वाटेल तसे भोगायचे, मौज-मजा करण्याची कोणतीही संधी चुकवायची नाही. कारण आपल्याला कोण विचारणार, आपला कोण जाब घेणार? मात्र हा विषय वाटतो तेवढा सोपा नाही. यावर गंभीरपणे विचार केल्याशिवाय मुळीच गत्यंतर नाही. आपल्याला यावर विचार करावाच लागणार आहे की मृत्यूनंतरच्या जीवनातील यशापयशाचे परिणाम आपल्या वर्तमान जीवनावर काय होतात.

आपण जर यावर खरोखरच विचार केला तर आपल्याला हे स्पष्टपणे आढळून येईल की या जगात बरेच लोक चांगले व वाईटही आहेत आणि बरेचजण सदाचारी व दुराचारीही आहेत. दुराचारी लोक अत्यंत मौज-मस्तीत जीवन व्यतीत करून जगाचा निरोप घेतात. त्यांच्या जीवनात समस्त सुखसाधने असतात. तर याउलट सदाचारी व सद्वर्तनी लोक दु:ख, समस्या, अडचणी आणि ना-ना प्रश्नांशी झुंजत असताना दिसतात. असेच समस्याग्रस्त जीवन कंठून ते या जगातून निघून जातात. या ठिकाणी विचार करण्यासारखी बाब अशी आहे की जे लोक सद्वर्तनी, सत्यनिष्ठ आणि सदाचारी असतात व याच सत्यनिष्ठतेपायी संकटमय जीवन जगत असतात, अल्लाहच्या निर्णयाचे प्रत्येक संकटमय पावलावर स्वागतच करीत असतात, मोठमोठ्या संकटांना न घाबरता आणि कोणत्याही प्रकारच्या आमिषाला बळी न पडता सत्याची कास सोडत बसतात, न्याय आणि सदाचाराकरिता अख्खे जीवन अल्लाहला समर्पित करतात आणि याच सत्याच्या मार्गावर जीवनाची वाटचाल करून जीवनाची सांगता करतात, त्यांच्या मनात निश्चितच ही जाणीव तीव्रपणे उचंबळून येते की जगाचा निर्माता व पोशिंदा प्रभू अल्लाह निश्चितच न्यायी आहे, तो आपल्या सत्यनिष्ठा व सदाचाराचा, आपल्या भावनांच्या बलिदानांचा, आपल्या सत्य समर्पणाचा निश्चितच उत्तम मोबदला देईल. या सदाचाराच्या बदल्यात एका अशा स्थायी, समाधानकारक, दु:खरहित आणि आनंददायी जीवनाची नितांत आवश्यकता आहे. एका अशा जीवनाची गरज आहे जेथे निश्चितच सदाचाराचे चांगले फळ आणि दुराचाराची शिक्षा मिळावी. शिवाय ज्या माणसाला या गोष्टीवर विश्वास असेल की या विश्वाचा रचयिता, निर्माता, सृष्टा, पोशिंदा, प्रभु अल्लाह आहे आणि त्यानेच हे सारे काही आपल्या सामर्थ्याने निर्माण केले, आपले स्वामित्व गाजविले, आपल्या प्रभुत्वाने सारी सृष्टी पोसली, तोच प्रभु अल्लाह निश्चितच सहजरित्या परत ही सृष्टी निर्माण करील. यात त्याला कोणत्याही प्रकारची अडचण येण्याचा प्रश्नच नाही. अशा अमर्याद सामर्थ्यशाली निर्मात्या प्रभु अल्लाहसाठी प्रत्येक मानवास परत जीवन देण्यात काहीही अडचण येणार नाही. मग शेवटी अल्लाहच्या पैगंबरांनी परलोकी जीवनाची जी खबर अथवा वार्ता दिली, त्यात मुळीच शंका

वाटण्याचे कारण नाही.

आणखीन एक सांगायचे झाल्यास तुम्ही कदाचित म्हणाल की माणसाला चांगल्या आणि वाईट कर्माचे फलित मिळण्यासाठी दुसऱ्या जीवनाची काय गरज आहे? हे तर या जीवनातही शक्य आहे! येथेसुद्धा दु:ख आहे, कष्ट आहे, सुख-समाधान आहे. येथेही उच्च-नीच आहे आणि या आधारावर हेदेखील जर मान्य करण्यात आले की याच जगात आपल्या पाप-पुण्याईचा मोबदला प्राप्त करण्यासाठी याच जगात वारंवार माणूस जन्म घेऊ शकतो. पुण्याईच्या बदल्यात सुखी-समाधानी जीवन प्राप्त होऊ शकते, पापकर्मांच्या मोबदल्यात दु:ख व यातनामय जीवन मिळू शकते. मात्र यावर थोडाजरी विचार केला तर तुम्हाला निश्चितच या गोष्टीवर विश्वास येईल की पाप-पुण्याच्या बदल्यात या वर्तमान जीवनात तर काहीही मिळणे शक्य नाही. जर आपण हे मान्य केले की सध्या अडीअडचणीत असलेली व्यक्ती मागच्या जन्मीच्या पापाची फळे भोगत असून सुखी-समाधानी व्यक्ती मागील जन्माच्या पुण्याची फळे चाखत आहे, तर आपल्यासमोर एक मोठा प्रश्न असा उभा राहतो की या जगात सर्वप्रथम पाऊल ज्या व्यक्तीने ठेवले होते, त्यास कोणत्या जन्माच्या पुण्य अथवा पापाचे फळ भोगण्यासाठी या जगात पाठविण्यात आलेले होते? कारण यापूर्वी तर त्याच्याकडे कोणत्याही प्रकारचे व्यावहारिक जीवन नव्हते. यापेक्षाही आणखीन महत्त्वाची गोष्ट अशी की आज जे लोक सुखी-समाधानी आहेत अथवा समस्या व संकटांनी ग्रस्त जीवन कंठीत आहेत, त्याच्यासंबंधी हे सांगता येणे शक्य नाही की ते पुण्यकर्माची बक्षिसे प्राप्त करताहेत की पापाची कडू फळे चाखत आहेत. उदाहरणार्थ, एखाद्या दीन-दु:खी आणि संकटग्रस्त व्यक्तीस पाहा. कदाचित तो या अवस्थेच्या स्वरूपात शिक्षा भोगत असेल. कारण मागच्या जन्मी कदाचित त्यास धन-दौलत अगर सत्ता मिळालेली असेल आणि त्याने कदाचित दुराचार वा पापकर्मे केली असतील आणि त्याच्या परिणामस्वरूपी तो या जन्मी शिक्षा भोगत असेल. याबरोबरच हेदेखील शक्य आहे की ही अवस्था मागील जन्मातील चांगल्या कर्मांचे उत्तम बक्षीस भोगण्यासाठी असावी. कारण मागच्या जन्मी तो कदाचित एखादा प्रामाणिक कुत्रा असावा आणि त्याच्या प्रामाणिकतेचे फळ म्हणून त्यास हे मानवी जीवन मिळालेले असेल. मग हे जीवन समस्या आणि संकटांनी ग्रस्त का असेना. शिवाय या अडचणींव्यतिरिक्त आणखीन एक मोठी अडचण अशी दिसते की या जन्मात माणूस पुढील जन्मासाठी काही कष्ट करून पुण्याईची कमाई करीत असण्याची शक्यता आहे. एवढेच नव्हे तर असेही म्हणणे वावगे ठरणार नाही की या वर्तमान जीवनात माणूस पुढील जन्मासाठी काही पुण्य कमावित असेल अथवा पुढील जीवनाच्या यशापयशाची पूर्ण भिस्त या जीवनाच्या पुण्य व पापकर्मांवर असेल. मग यातदेखील आणखीन एक अडचण अशी निर्माण होते की एक माणूस एकीकडे शिक्षा भोगत आहे वा बक्षीस मिळवित आहे आणि दुसरीकडे तर हीच शिक्षा आणि बक्षीस त्याच्या

पुढील जन्माकरिता यशापयशाचे कारण ठरत असेल, हे कोणत्याही पैलूने बुद्धिसंमत वाटत नाही.

या समस्त बाबींव्यतिरिक्त आणखीन एक पैलू असा की आपण जर कोणत्याही दृष्टिकोनानुसार या वारंवार जन्म घेण्यावर विचार केला तर ते शक्य वाटत नाही. या जीवात जो माणूस जेवढी कर्मे करतो, ती सर्व प्रकरणे त्याच्या जीवनाबरोबरच संपूर्ण जाणारी बाब मुळीच नाही. उदाहरणार्थ, एखाद्या नराधमाने एखाद्या निष्पाप माणसाचा वध केला आणि जर त्या खुन्यास या अपराधास्तव फाशीची शिक्षा देण्यात आली तर हे प्रकरणदेखील इथेच संपत नाही. कारण त्याचा एक गुन्हा असा होता का त्याने एका निष्पाप माणसाला जीवातून उठविले. मात्र याबरोबरच मृताच्या परिवारास असंख्य आर्थिक, मानसिक छळ सोसावा लागला. बिचाऱ्याची मुलेबाळे रस्त्यावर आली, पत्नी विधवा व निराधार झाली. मुले अनाथ झाल्याने शिक्षणाची सोय झाली नाही आणि दर-दर भीक मागून अख्खे जीवन व्यर्थ घालवावे लागले. शिवाय नंतरच्या कित्येक पिढ्या या दुष्कृत्यामुळे वाया गेल्या अर्थात त्याच्या खून करण्याच्या अपराधाचे परिणाम फक्त मृतकासच नव्हे तर परिवार, समाज आणि न जाणो कोणाकोणास भोगावे लागले असतील. जर सत्य आणि न्यायासहित त्यास त्याच्या पापाची पूर्णपणे शिक्षा द्यायची झाल्यास केवळ फाशी दिल्याने कसे चालेल? मृतकाच्या परिवारजनांचे जे जीवन उद्‌ध्वस्त झाले त्याचे काय? जर फाशी होताच त्याच्या पापाची शिक्षा म्हणून त्यास कुत्रा अथवा मांजराच्या जन्मी घालण्यात आले तर ते असे ठरेल जणू एखाद्याचे खाते बंद करण्यापूर्वीच त्याचा हिशेब पूर्ण करण्याचा एखाद्याने निर्णय घ्यावा. हीच परिस्थिती पुण्यकर्मांचीदेखील आहे. माणूस बरीच कर्मे अशी करतो, ज्यांचे उत्तम परिणाम त्याच्या मृत्यूनंतरसुद्धा मानवजातीस प्राप्त होत असतात. उदाहरणार्थ, एखाद्या माणसाने एखादी शाळा काढली. जोपर्यंत लोक त्या शाळेत शिक्षण घेत राहतील तोपर्यंत त्यास याचे पुण्य लाभत असेल. कोण जाणे किती शतकांपर्यंत ही शाळा सुरू राहील आणि लोकांना शिक्षणासारखी अमूल्य संपत्ती प्राप्त होत राहील. अशा अवस्थेत त्याला मेल्यानंतर तात्काळ त्याच्या पुण्याचा मोबदला कसा देता येईल. कारण अद्याप त्याच्या पुण्यकर्माचे खातेच बंद झालेले नसणार.

अशाप्रकारे विचार केल्यास हीच बाब स्पष्ट होते की जर माणसाला त्याच्या पुण्य वा पापाचे योग्य फलित मिळावयास हवे असेल तर त्यास एक असे जीवन हवे जे हे जग नष्ट झाल्यानंतर सुरू व्हावे आणि ते परलोकी जीवन कायमस्वरूपी व स्थायी स्वरूपाचे असावे. ज्या ठिकाणी माणसाला पूर्ण रूपाने त्याच्या पुण्य वा पापांची फलिते मिळणे शक्य व्हावे. कारण या वर्तमान जगातील क्षणभंगूर जीवन या फलितांसाठी पुरेसे ठरू शकत नाही, मात्र निश्चित!

# यशाचा खरा मार्ग

आतापर्यंत ज्या गोष्टींचा उहापोह करण्यात आला, त्या गोष्टी अत्यंत स्पष्ट आणि सहज लक्षात येण्यासारख्या आहेत. मात्र यासाठी आपले मनमस्तिष्क अतिशय निष्पक्ष आणि कोरे असणेही आवश्यक आहे. जर पूर्वीच आपण एखादा विशिष्ट विचार मनात घेऊन बसलो तर कोणतेही सत्य आपल्या अंत:करणास स्पर्श करू शकत नाही, हे निश्चित! शिवाय ज्या ज्या वेळी या जगात अथवा देशात धर्म हा आपल्या मूळ स्वरूपात आला, त्या प्रसंगी या मूळ धर्माकडूनसुद्धा हेच घोषित करण्यात आले. आजसुद्धा या गोष्टी कोणत्या न् कोणत्या स्वरूपात जगातील समस्त धर्मांत आढळतात. कारण असे की धर्म हा नेहमीच आपल्या मूळ स्वरूपानुसार एकच असतो आणि असे व्हावयासही हवे. अल्लाह एकच आहे! म्हणूनच त्याच्याकडून येणारा संदेशसुद्धा एकच असून त्याचे खरे नाव इस्लाम असे आहे. अर्थातच असा धर्म जो मानवास अल्लाहसमोर आत्मसमर्पण करण्याची शिकवण देतो. प्रत्येक काळात अल्लाहकडून प्रत्येक देश वा राष्ट्रात त्याच्या पैगंबरांच्या माध्यमाने जो धर्म आला, तो मुळात इस्लाम हाच धर्म होय. मात्र जसजसा काळ लोटत गेला तसतसे लोकांनी आपापल्या सवलतीनुसार परिवर्तन घडवून आणले. पाहिजे ते समाविष्ट केले आणि नको ते वजा केले. याच प्रकारातून मग विविध शाखा फुटल्या आणि बरेच कृत्रिम धर्म निर्माण झाले. मात्र धर्म हा मूळ स्वरूपात एकच असून या मूळ धर्माचा आधार निम्नलिखित तीन गोष्टींवर आहे. (१) हे विश्व अल्लाहशिवाय निर्माण झालेले नसून अल्लाहशिवाय कार्यरत नाही. तो सर्वगुणसंपन्न असून त्याच्या समान इतर कोणीही नाही. (२) अल्लाहने आपली महत्त्वपूर्ण निर्मिती अर्थात मानवजातीस आपला संदेश पैगंबरांच्या माध्यमाने पाठविला आणि प्रत्येक काळ व प्रत्येक भूभागात पाठविला. कोणासही यापासून वंचित ठेवले नाही. (३) समस्त मानवांना एके दिवशी आपल्या खऱ्या स्वामीसमोर अर्थात अल्लाहसमोर आपल्या भल्या-बुऱ्या कर्मांचा जाब द्यावा लागणार आहे. प्रत्येकास त्याच्या प्रत्येक चांगल्या कर्माचा चांगला आणि वाईट कर्माचा वाईट मोबदला मिळणारच.

या तीन गोष्टी इस्लामच्या मूलभूत गोष्टी असून इस्लाम हाच धर्म नेहमीकरिता अल्लाहकडून आलेला सत्यधर्म होय. सर्वांत शेवटी इस्लाम धर्म आपल्या मूळ, परिपूर्ण आणि अंतिम स्वरूपात अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यामार्फत जगात आला. त्यांचे पूर्ण जीवन आजही आपल्या मूळ स्वरूपात आपल्याकडे उपलब्ध आहे. त्यांच्याशिवाय इतर कोणत्याही पैगंबराच्या जीवनाचा मूळ इतिहास आज उपलब्ध नाही.याचप्रमाणे अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरित झालेला ईशग्रंथ अर्थात कुरआनसुद्धा मूळ स्वरूपात उपलब्ध आहे. याव्यतिरिक्त जगात इतर कोणताही ईशग्रंथ त्याच्या मूळ स्वरूपात कोठेही उपलब्ध नाही. आता जग अस्तित्वात असेपर्यंतच्या समस्त मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आणलेला धर्म अर्थात इस्लाम धर्म मार्गदर्शन करू शकतो. या काळात स्वत:ला इस्लाम धर्माचा अनुयायी असण्याचा दावा करणारे

भरपूर लोक आहेत. मात्र अल्लाहच्या दृष्टिकोनात खरा मुस्लिम केवळ तोच आहे, जो इस्लामच्या नियमांवर आपले विचार आणि भावना तसेच आपले जीवन समर्पित करण्याचा प्रयत्न करतो. इस्लाम व कोण्या विशिष्ट जाती-धर्माच्या लोकांचा, विशिष्ट भू-प्रदेशाचा अथवा विशिष्ट काळापुरता धर्म नसून तो अल्लाहकडून समस्त मानवजातीकरिता व जग अस्तित्वात असेपर्यंत एक विश्वव्यापी जीवनमार्ग आहे. या धर्माची सर्वप्रथम शिकवण अशी की मानवाने एकाच अल्लाहस या जगाचा निर्माता, पोशिंदा आणि पूज्य स्वीकारावे. त्याचीच एकट्याची आराधना करावी, त्याच्या आदेशांचे पालन करावे. इतर कोणासही त्याच्यासम ठरविता कामा नये. त्याच्याव्यतिरिक्त इतर कोणाचीही पूजा करता कामा नये, कोणाच्याही आदेशाचे पालन करता कामा नये. अर्थातच यावर पूर्ण विश्वाससुद्धा असावा की अल्लाहच पूज्य आणि आराध्य असून केवळ त्याच्या मर्जी व कायद्यानुसारच जीवनाची वाटचाल करावी, आपले तन-मन-धन केवळ त्याला समर्पित करावे, त्याच्याच समोर नतमस्तक व्हावे, त्यालाच मदत मागावी, त्याचाच धावा करावा आणि त्याच्याच मर्जीचे जीवनाच्या अंतिम श्वासापर्यंत पालन करावे. या विश्वाचा व आपला स्वामी त्यालाच मानावे. त्याच्याव्यतिरिक्त इतक कोणाचीही आज्ञा पाळता कामा नये. इतर कोणाही व्यक्तीने दाखविलेला मार्ग स्वीकारून जीवनाची वाटचाल करून स्वत:चे वाटोळे करून घेता कामा नये.

जी व्यक्ती अशा स्वरूपात अल्लाहचा स्वीकार करते, ती ईशमार्गाशिवाय इतर कोणाच्याही मार्गदर्शनाचा अवलंब करू शकत नाही. स्वत:च्या इच्छा-अभिलाशा आणि आवडीनिवडीसुद्धा अल्लाहच्या मर्जीच्या स्वाधीन करते. अल्लाहने आपल्या अंतिम पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यामार्फत दिलेल्या जीवनमार्गानुसार जीवन जगून यशस्वी व कल्याणकारी जीवनाची वाट धरावी. इस्लामची दुसरी अट अशी आहे की अल्लाहने जीवन जगण्यासाठी जो मार्ग दिला तो पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यामार्फत दिला आणि इस्लाम हेच त्याचे नाव होय. अर्थात माणसाने पैगंबर मुहम्मद (स.) यांना अंतिम पैगंबर मानावे आणि अशी धारणा ठेवावी की ते या समस्त जगवासियांकरिता अल्लाहचा संदेश घेऊन आले आणि सर्वांचे पैगंबर व कल्याणकारी सुधारक आहेत. त्यांच्यानंतर आता कोणीही पैगंबर येणार नाही. यासाठी त्यांच्यावर अल्लाहकडून अवतरित झालेला अंतिम ईशग्रंथ हा कुरआन असून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या ग्रंथानुसार स्वत: प्रत्यक्ष कर्म करून दाखविले. इस्लामची तिसरी धारणा अशी की मानवाने या गोष्टीवर श्रद्धा ठेवावी की त्यास मृत्यूपश्चात आपल्या प्रत्येक कर्माचा अल्लाहसमोर जाब द्यावा लागणार आहे. यासाठी त्यास परत जीवन प्राप्त होणार असून ते कधीही संपणारे नसेल. माणसास त्याच्या प्रत्येक चांगल्या कर्माचा चांगला मोबदला स्वर्गरूपी जीवनाच्या स्वरूपात मिळणार आणि वाईट कर्मांचा मोबदला नरकाच्या यातनामय जीवनाच्या स्वरूपात मिळणार आहे, हे निश्चित!

या इस्लामच्या मूलभूत आणि महत्त्वपूर्ण शिकवणी असून या शिकवणी माणसाच्या अंत:करणाची साद होय. हे समजून घेण्यासाठी कोणत्याही प्रकारची अडचण येणार नाही!

-०- समाप्त -०-